**केळझर डावा कालवा चारी क्र.८ चे वाढीव काम, जि. नाशिक द्वितिय सुधारित प्रकल्प अहवाल प्रस्तावास विशेष दुरूस्ती / विस्तार व सुधारणा अंतर्गत प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१८/ (प्र.क्र.३४८/२०१८)/ सिं.व्य.(कामे)**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: ०५ /११/ २०१८.

<u>वाचा</u> - १. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे पत्र क्र.
i) कासं/तापाविम/प्रशा-२/४७०६/सन-२०१८, दि.२३/०८/२०१८.
ii) तापाविम/काअ/प्रवि/प्रमा/६७/९९, दि.०२/०२/१९९९.
iii)तापाविम/तांस/प्रशा १/सुप्रमा/मप्र/१५/२००७, दि.०६/११/२००७.

२. राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती, नाशिक यांचे पत्र क्र. जा.क्र.रातांसस/ कक्ष-२/ केळझर डावा कालवा चारी क्र.८/(धा.क्र.११९/२०१८)/६८८/२०१८, दि.०१.०८.२०१८

३. अधीक्षक अभियंता(कालवे), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक यांचे पत्र जा.क्र. अअ(का)/कासंवि-४/५८६/२०१८,दि.२१.०८.२०१८.

४. शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१५/४२५/२०१५, दि.१६/११/२०१६,

५. वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/(प्र.क्र.३०/२०१३)/विनियम भाग-२, दि.१७/०४/२०१५.

**<u>प्रस्तावना</u> :-**

केळझर धरण, ता.बागलाण या गावाजवळ आरम नदीवर बांधण्यात आले आहे. धरण पूर्ण असून धरण व त्याचे जलनियोजन व्यवस्थापन मालेगाव पाटबंधारे विभाग,मालेगाव विभागाकडे आहे. केळझर प्रकल्पाच्या पूर पाण्याने दोन पाझर तलाव (तरसाळी, भाक्षी-१), दोन को.प.बंधारे (मुळाणे, भाक्षी) व भविष्यकालीन बंधारे पुर्नभरण करण्यासाठी वाढ व विस्तार योजनेअंतर्गत केळझर चारी क्र. ८ प्रस्तावित आहे. योजनेअंतर्गत कालव्याच्या मुखाशी २६.३० घ.फू./ सेकंद विसर्ग क्षमता आहे. योजनेसाठी २२.१४ पाणी वापर प्रस्तावित आहे. कालवा कि.मी. ० ते ११ मधील ९२ हेक्टर क्षेत्रास अप्रत्यक्ष सिंचनाचा लाभ होत आहे. आता तापी पाटबंधारे विकास महामंडळाने दि.२३/०८/२०१८ नुसार रोजी पत्रान्वये रु.४९७.०० लक्ष किंमतीचा व्दितीय सुप्रमा प्रस्ताव पुढील कार्यवाहीसाठी शासनास सादर केला आहे. प्रकल्पाच्या मुख्य कालव्याचे कि.मी. १ ते २० चे काम १००% पूर्ण झाले असून वितरण प्रणालीचे ५५ % काम पूर्ण झाले आहे. उर्वरित रु.२७३ लक्ष किंमतीचे काम पूर्ण होण्यासाठी सदर वाढविस्तार योजनेच्या व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या पुढील कार्यवाहीसाठी सादर करण्यात येत आहे. सदर गळती बंद होण्यासाठी आवश्यक ती गळती प्रतिबंध म्हणून बंदिस्त आर.सी.सी पाईपलाईन करण्याचे प्रस्तावित आहे व तसेच कालव्यावरील भराव मजबूती व दुरुस्ती करण्याचे नियोजन आहे.सदर कामाची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधी, पाणी वापरसंस्थेने व लाभक्षेत्रातील शेतकऱ्यांनी वेळोवेळी केलेली होती. या शासन निर्णयान्वये विभागास देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर कामाकरीता

विशेष दुरुस्ती / विस्तार व सुधारणातंर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u> :-**

**केळझर डावा कालवा चारी क्र.८ चे वाढीव काम, जि. नाशिक द्वितिय सुधारित प्रकल्प अहवाल** विशेष दुरूस्ती कामास विस्तार व सुधारणा अंतर्गत रु.४२७.६९ लक्ष, ETP रु.६९.३३ लक्ष , अशा एकूण रु.४९७.०२ लक्ष ( रू.चारशे सत्त्यानव्व लक्ष दोन हजार फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास आं.वि.स.व उ.स. तथा नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिं.व्य.(कामे), ०१.०१.२०१५ मधील मागदर्शक सूचनांचे पालन करणे अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे महामंडळावर बंधनकारक आहे.

२. शासन परिपत्रक क्र. सिंचन - २०१५/प्र.क्र.२४/(भाग-२)/२०१५/जसं(धोरण), दि.०२/०२/२०१७ मधील मागदर्शक सूचनांनुसार कार्यवाही करावी.

३. शासन पत्र दि.०४/०६/२०१६ अन्वये तपासणी सूचीतील मुद्दे आर्थिक निकष मा. राज्यपाल यांच्या निर्देशानुसार २ % मर्यादेत निधी खर्च करणे, दायित्व निर्मिती मर्यादेत राहण्यासाठी कामाचे दोन वर्षाचे नियोजन करणे याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

४. सविस्तर संकल्पन करुनच तांत्रिक मान्यता देण्यात यावी, तसेच व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेच्या आत अंदाजपत्रकाची किंमत राहील व याबाबतची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

५. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पने दरसूची बाह्यबाबी व वहन अंतरे तपासून अंदाजपत्रकास सक्षमस्तरावर तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

६. प्रकल्पावरील पाणी वापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे नियोजन काम सुरु करण्यापूर्वी करावे, कामे पूर्ण झाल्यानंतर लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस हस्तांतरण करावे याची जबाबदारी अधीक्षक अभियंता यांची राहील.

७. माती कामे व गवत झाडे / झुडपे काढण्याची कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध मशिनरीने करावीत.

८. प्रस्तावीत कामांमुळे खोदकाम/ तोडफोड उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

९. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.

१०. सदरची कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचा पूर्णत्व अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.

११. विषयांकित व्दितीय सुप्रमा अंदाजपत्रकातील तरतूदी, दर, वहनअंतर, संकल्पन व इतर तांत्रिक निकष याबाबतची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रिय मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांची राहील.

१२. सदर व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे व्दितीय सु.प्र.मा. अंदाजपत्रकातील कामे कार्यान्वित करण्याच्या विविध टप्पयांवर झालेल्या अनियमिततेस मान्यता गृहीत धरता येणार नाही. सदर सु.प्र.मा. देणेपूर्वी अथवा नंतरही या कामावर कोणतीही अनियमितता झालेली असल्यास अथवा आढळल्यास सदर सु.प्र.मा. प्रदान केल्याने ती नियमित झालेली आहे, असे गृहीत धरता येणार नाही.

१३. सदर व्दितीय सु.प्र.मा. अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, CWC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपध्दत याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

१४. सदर व्दितीय सु.प्र.मा. अंदाजपत्रकातील कामांच्या व्दितीय सु.प्र.मा. मध्ये अंर्तभूत किंमतीला तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घ्यावी.

प्रस्तावित कामावर होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च (योजनांतर्गत) विशेष दुरुस्ती / विस्तार व सुधारणा १२ (०३) तापी पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान ( ४७०१ जे १७५ ) या मुख्य लेखाशिर्षखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/(प्र.क्र.३०/२०१३)/विनियम भाग-२, दि.१७.४.२०१५ मधील भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ व पृ.क्र. ६२ मध्ये विहित केलेल्या खर्चाबाबतीत रू. ५.०० कोटी पर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे विभागास प्राप्त अधिकाराच्या अनुषंगाने आंतरवित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने, तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १३०/१४३४, दि. १२/०९/२०१८ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२२२/व्यय-१२, दि.०४/१०/२०१८ नुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०१८११०५१६१४२००८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2018.11.05 16:18:30 +05'30'

( अ.अ. कपोले )
शासनाचे उप सचिव

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,
७) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
८) मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१३) कार्यकारी संचालक,तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव,
१४) मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव,
१५) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१६) अधीक्षक अभियंता, धुळे पाटबंधारे प्रकल्प मंडळ,धुळे ,
१७) कार्यकारी अभियंता,तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव,
१८) कार्यकारी अभियंता, गिरणा नदी खोरे प्रकल्प विभाग, नाशिक,
१९) सिं.व्य.(कामे) कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१८/ (प्र.क्र.३४८/२०१८)/ सिं.व्य.(कामे), दि. ०५ /११ /२०१८ चे सहपत्र**

## परिशिष्ट

| Sr.No. | Sub Head | Provision in 1st R.A.A. | Provision In 2nd R.A.A |
|---|---|---|---|
| **1** | **2** | **3** | **4** |
| 1 | A-Preliminary | 0.49 | 0.49 |
| 2 | B-Land | 24.91 | 55.64 |
| 3 | C-Works | 0 | 0 |
| 4 | D-Regulator | 15.38 | 23.43 |
| 5 | E-FALL | 7.76 | 35.31 |
| 6 | F.R.H.T. works | 74.3 | 120.83 |
| 7 | G-Bridges | 9.19 | 38.86 |
| 8 | K-Building | 0 | 0 |
| 9 | L-Earth work | 64.84 | 142.6 |
| 10 | M-Plantation | 0.18 | 0.18 |
| 11 | O-Misc | 3.62 | 3.62 |
| 12 | P-Maintainance | 0.15 | 0.15 |
| 13 | Q-Spl. T & P | 6.59 | 6.59 |
| 14 | R-Communication | 0 | 0 |
| | **Total** | **207.41** | **427.69** |
| | E.T.P. | 39.53 | 69.33 |
| | **Total** | **246.94** | **497.02** |

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5,
cn=Atul Ashok Kapole
Date: 2018.11.05 16:20:15 +05'30'

( अ.अ.कपोले )
शासनाचे उप सचिव